**राज्यसेवा परिक्षा- २०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या आदिवासी विकास सेवा, गट-ब संवर्गासाठी ५ अधिसंख्य पदे दोन वर्षासाठी निर्माण करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-३७१९/प्र.क्र.२७३/का.१५

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०२ जानेवारी, २०२०.

**वाचा -**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र.टिआरएन-२०१८/प्र.क्र.३५/सीपीटीपी, दि.२५.०९.२०१९ व दि.३१.१०.२०१९.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वि.सु.-१, दि.२०.०२.२०१६.

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परिक्षेद्वारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ व गट-ब मधील उमेदवारांकरीता एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम संदर्भाधीन क्र.०१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. त्यानुषंगाने राज्यसेवा परिक्षा-२०१८ च्या अंतिम निकालाच्या आधारावर महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड झालेल्या व एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-६ मध्ये प्रशिक्षण घेणाऱ्या आदिवासी विकास सेवेतील सहायक प्रकल्प अधिकारी, गट-ब संबर्गातील उमेदवारांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-६ अंतर्गत रुजू झालेल्या आदिवासी विकास सेवा, गट-ब संवर्गातील उमेदवारांकरीता S-१५ : ४१८०० -१३२३०० या वेतनस्तरामध्ये ०५ अधिसंख्य पदे दि.०२.१०.२०१९ ते दि.०३.१०.२०२१ या कालावधीकरीता निर्माण करण्याकरीता शासन मंजूरी देत आहे.

२. सदर ५ अधिसंख्य पदे आदिवासी विकास विभागाच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

३. आदिवासी विकास सेवा, गट-ब संवर्गातील ०५ अधिसंख्य पदांवरील दि.०२.१०.२०१९ पासून दोन वर्ष कालावधीतील ठोक वेतनावर येणारा खर्च “मागणी क्र. टी-२, २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्गीय व अल्पसंख्यांक यांचे कल्याण, ०२ अनुसूचित जमातींचे

कल्याण, ००१, संचलन व प्रशासन, (००)(०२) प्रादेशिक कार्यालये-जनजाती विकास आयुक्तालय (२२२५ १०३४)" या लेखाशीर्षाखाली संबंधित आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदींमधून भागविण्यात येईल.

४. आदिवासी विकास सेवेतील सहायक प्रकल्प अधिकारी व तत्सम, गट-ब संवर्गात निवड झालेले व एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम अंतर्गत वनामती, नागपूर येथे प्रशिक्षण घेत असलेल्या उमेदवारांचे ठोक वेतन अदा करण्यासाठी सहायक आयुक्त (लेखा), आदिवासी विकास, अपर आयुक्त कार्यालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वि.सु.-१, दि.२०.०२.२०१६ मधील तरतूदींनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०२१५०४२३१३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GOVIND MAHADEO MAINKAR

Digitally signed by GOVIND MAHADEO MAINKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=93cbea44cdf3d68abe120a0a967fe5ac93d28b63146be4c3c432f21653b6f6ba, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=301866cb28a109fa37f9b2b3be066426406ccfe599d4017f33195279f8ae8c13, ou=NA, o=GOVERNEMENT OF MAHARASHTRA, cn=GOVIND MAHADEO MAINKAR
Date: 2020.01.02 15:07:52 +05'30'

**( गोविंद माईणकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०,
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई-४०० ०२०,
३. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
५. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महासंचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, धरमपेठ, अमरावती रोड, नागपूर-४४२ ४१०,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
१०. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
११. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर,
१२. सर्व सह / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
१४. कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (वि.सु.-१) मंत्रालय, मुंबई-३२.
१५. निवड नस्ती (का.१५).